तुगागमकार्य करतेवेळी जरी 'खरि च' सू. १२१ या त्रैपादिक सूत्रानें होणारे चर्त्वकार्य असिद्ध ठरते तरी, सापादिक तुगागम-कार्य प्रथम केल्यावर नतर 'खरि च' या सूत्रानें होणारे चर्त्वकार्य असिद्ध मानण्यास काहीं प्रमाण नाही. म्हणून चर्त्वकार्य असिद्ध असल्यामुळे सन्निपातपरिभाषा ('सेनासुराच्छाया' या स्थली) प्रवृत्त होण्यास प्रतिबंध येतो अशी शंका करू नये, म्हणजे ही शंका अयोग्य ठरते. (तुगागमकार्य सापादिक असून चर्त्वकार्य त्रैपादिक असल्यामुळें जेव्हा या दोन्ही कार्यांची एखाद्या लक्ष्याचे ठिकाणी युगपत् प्राप्ति होते तेव्हा 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें सापादिक शास्त्र त्रैपादिक शास्त्राला बाधून स्वतःच प्रथम प्रवृत्त होतें. पण तं सापादिक शास्त्र प्रथम प्रवृत्त होऊन त्या सूत्रानें होणारे कार्य झाल्यावर नतर त्रैपादिक शास्त्राची प्रवृत्ति होऊ देण्यांत 'पूर्वत्रा-सिद्धम्' हें वचन आड येत नाहीं व त्रैपादिकशास्त्र नतर प्रवृत्त होऊ शकतेच. म्हणून वरील पाणिनीय निर्देशातील छकाराला सापादिक शास्त्रानें होणारा तुगागम प्रथम केल्यास 'सुराछाया' या स्थली 'छ्त्' अशी स्थिति झाली असता, 'स्तोः श्चुना श्चुः' या सूत्रानें तकाराचा चकार केल्यानें 'छ्च्' अशी जेव्हा स्थिति होते तेव्हा छकारापुढें चकार हा 'खर्' असल्यामुळें 'खरि च' हें त्रैपादिक सूत्र प्रवृत्त करतेवेळी 'पूर्वत्रासिद्धम्' हें वचन आड येत नाही व ते सूत्र प्रवृत्त केल्यास पूर्वी सांगितल्या-प्रमाणे पाणिनीय निर्देशात द्विचकारयुक्त रूप निर्दिष्ट असावयास पाहिजे होतें. पण लौकिक न्यायसिद्ध सन्निपात परिभाषा त्रिपादीत प्रवृत्त होण्यात कोणताहि प्रतिबंध येत नसल्यामुळें त्रैपादिक चर्त्वकार्य करतेवेळी ती परिभाषा प्रवृत्त केल्यास, वरील पाणिनीय निर्देशातील छकाराचे जागी 'खरि च' या सूत्रानें होणारा चकार करता येत नाहीं; कारण छकाराच्या निमित्तामुळें जो 'तुक् = त्' आगम झाला आहे व ज्याचे जागीं 'स्तोः श्चुना' या सूत्रानें चकार झाला आहे तो तुगागम दीर्घ अच् व छकार या

सन्निपाताचा विघात – नाश – करण्यास प्रवृत्त होऊं शकत नाही छकाराचे जागी चकार केल्यास, वरील सन्निपात नष्ट होतो हें उघड आहे म्हणून सन्निपात परिभाषा असल्यामुळें 'खरि च' हें सूत्र प्रवृत्त न केल्याम छकाराचा चकार न होता छकारापुढें पाणिनीय निर्देशात चकाराचे श्रवण व्हावयास पाहिजे हाते पण त्या निर्देशात चकारद्वय नसून किंवा छकारापुढें चकार नसून छकारापूर्वी चकार असल्यामुळें त्या निर्देशावरून हे स्पष्ट होते की, दीर्घ अचापुढें छकार आला असता, छकारास तुगागम होत नसून दीर्घ अचालाच प्रकृत सूत्रानें तुगागम होतो म्हणून प्रकृत सूत्राचा दीक्षितानीं कौमुदीत जसा अर्थ केला आहे तसाच अर्थ करणे योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) कार्य वैकल्पिक असले तरी अधिक फलाची प्राप्ति होण्याकरिता ते वैकल्पिक कार्य करणे उचित आहे असे या पाणिनीय निर्देशाचे तात्पर्य आहे (दीर्घ अच् पदान्ती असून त्यापुढें छकार आला असता जरी 'पदान्ताद्वा' सू १४९ या सूत्रानें दीर्घ अचाला तुगागम करणें वैकल्पिक आहे तरी, तसा वैकल्पिक तुगागम केल्यानें अधिक फलाची प्राप्ति होत असल्यामुळे तसा तुगागम करणे उचित आहे हे वरील पाणिनीय निर्देशावरून सिद्ध होतें, कारण त्या निर्देशात 'सुरा' या पदातील अन्त्य 'आ' या दीर्घ अचापुढें छकार आला असल्यामुळें त्या दीर्घ अचाला वर सांगितल्याप्रमाणे तुगागम करणे वैकल्पिक असून देखील पाणिनीनें तुगागम केला आहे )

हल्सन्धिप्रकरण समाप्तम्

---


VIDYA